**वस्त्रोद्योग आयुक्तालय कार्यालयांमधील नामनिर्देशनाच्या कोट्यातील गट-ब (अराजपत्रित) व गट-क मधील पदे सरळसेवेने भरण्यासाठी राज्यस्तरीय निवड समिती स्थापन करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग**
**शासन निर्णय क्र. आस्था-२०२१/प्र.क्र.३२१/टेक्स-२**
मंत्रालय विस्तार, मुंबई-४०० ०३२.
दिनांक: ०२ नोव्हेंबर, २०२१

वाचा : शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्र.प्रनिमं-१२१६/(प्र.क्र.६५/१६)/१३-अ दि.१३.०६.२०१८

**प्रस्तावना :-**

नामनिर्देशनाच्या कोट्यातील गट - ब ( अराजपत्रित ) व गट - क संवर्गातील पदे सरळसेवेने भरण्याच्या कामात एकसुत्रता , नि : पक्षपातीपणा व समान दर्जा राखणे आणि उमेदवारांना समान संधी उपलब्ध करुन देणे आवश्यक असल्याने पदभरतीच्या कार्यपद्धतीसंदर्भात सामान्य प्रशासन विभागाने संदर्भाधीन दिनांक १३.०६.२०१८ च्या शासन निर्णयाद्वारे एकत्रित आदेश निर्गमित केले आहेत. सदर आदेशास अनुसरुन वस्त्रोद्योग आयुक्तालय कार्यालयामधील नामनिर्देशनाच्या कोट्यातील गट - ब (अराजपत्रित) व गट - क संवर्गातील पदे सरळसेवेने भरण्यासाठी राज्यस्तरीय निवड समिती स्थापन करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती .

**शासन निर्णय:**

सामान्य प्रशासन विभागाच्या संदर्भाधीन दिनांक १३.०६.२०१८ च्या शासन निर्णयाद्वारे भूतपूर्व दुय्यम सेवा निवड मंडळाच्या कक्षेतील नामनिर्देशनाच्या कोट्यातील गट - ब ( अराजपत्रित ) व गट- क संवर्गातील पदे सरळसेवेने भरताना अनुसरावयाची कार्यपद्धती निश्चित केली आहे. त्यानुसार सामान्य प्रशासन विभागाने भूतपूर्व दुय्यम सेवा निवड मंडळाच्या कक्षेतील नामनिर्देशनाच्या कोट्यातील गट - ब (अराजपत्रित ) व गट - क संवर्गातील पदे सरळसेवेने भरण्यासाठी (अ) जिल्हा निवड समिती व (ब) प्रादेशिक व राज्यस्तरीय निवड समित्या स्थापन करण्याच्या सूचना दिलेल्या असून निवड समित्यांसाठी कालबद्ध कार्यक्रम, निवड प्रक्रियेची पद्धती निश्चित केली आहे. त्यास अनुसरून वस्त्रोद्योग आयुक्तालय कार्यालयामधील गट - ब ( अराजपत्रित ) व गट - क मधील नामनिर्देशनाच्या कोट्यातील पदे सरळसेवेने भरण्यासाठी आयुक्त (वस्त्रोद्योग) यांच्या अध्यक्षतेखाली खालीलप्रमाणे राज्यस्तरीय निवड समिती स्थापन करण्यात येत आहे.

**राज्यस्तरीय निवड समिती**

| अ.क्र | समितीचे सदस्य | पदनाम |
|---|---|---|
| १ | आयुक्त (वस्त्रोद्योग), वस्त्रोद्योग आयुक्तालय, नागपूर | अध्यक्ष |
| २ | अनु.जाती/अनु.जमाती/इ.मा.व., प्रतिनिधी (गट -अ अधिकारी) | सदस्य |
| ३ | अल्पसंख्यांक प्रतिनिधी, (गट-अ) अधिकारी, तथापि, गट-अ मधील अधिकारी उपलब्ध होत नसल्यास गट-ब मधील राजपत्रित अधिकारी | सदस्य |
| ४ | वरील १ ते ३ पैकी एकही सदस्य महिला नसल्यास अध्यक्षांनी निवडलेला गट-अ मधील महिला अधिकारी | सदस्य |
| ५ | वस्त्रनिर्माण तज्ञ, गट-अ, वस्त्रोद्योग आयुक्तालय, नागपूर | सदस्य सचिव |

२. उपरोक्त राज्यस्तरीय समितीमधील इतर सदस्यांचे नामनिर्देशन समितीचे अध्यक्ष आयुक्त (वस्त्रोद्योग) यांचेमार्फत त्यांच्या स्तरावरुन करण्यात यावेत आणि त्याबाबत शासनास वेळोवेळी अवगत करावे.

३. उपरोक्त राज्यस्तरीय समिती ही वस्त्रोद्योग आयुक्तालय कार्यालयामधील नामनिर्देशनाच्या कोट्यातील गट - ब (अराजपत्रित) व गट - क संवर्गातील पदे सरळसेवेने भरण्यासाठी सामान्य प्रशासन विभागाने संदर्भाधीन दिनांक १३.०६.२०१८ रोजीच्या शासन निर्णयान्वये विहीत केलेल्या कार्यपद्धतीचे तसेच , अटी व शर्तीचे पालन करुन भरती प्रक्रिया पार पाडण्यासाठी जबाबदार राहील .

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२१११०२१६१३३४०८०२ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Gauri Rahul Maske

Digitally signed by Gauri Rahul Maske
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=COOPERATION MARKETING AND TEXTILE DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=9e5721a987027f2e238034188d086bb44a9aa24eeb5b83735e1bbb433b57d4ef, pseudonym=8E418E065B80AEB6DAFCE1207B8AB78C4C6D0CD3, serialNumber=B018BA858DD6B20CC7A84F6BC86A86D6A6E9AC3AC56C5DBFCD89F36C74DE3E1F, cn=Gauri Rahul Maske
Date: 2021.11.02 16:16:56 +05'30'

**( गौरी रा. म्हस्के )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१) मा. मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई
२) मा. उपमुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई
३) मा.विरोधी पक्षनेता विधानसभा/विधानपरिषद, विधानभवन, मुंबई

४) मा. मंत्री (वस्त्रोद्योग), यांचे खाजगी सचिव मंत्रालय, मुंबई
५) मा.राज्यमंत्री (वस्त्रोद्योग) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
६) मा. मुख्य सचिव,यांचे स्वीय सहाय्यक मंत्रालय, मुंबई
७) अपर मुख्य सचिव, सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई
८) प्रधान सचिव (वस्त्रोद्योग) यांचे स्वीय सहाय्यक सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई
९) प्रधान महालेखापाल, महाराष्ट्र १/२ (लेखा व अनुज्ञेयता/लेखापरिक्षा) मुंबई/नागपूर.
१०) जिल्हा कोषागार अधिकारी, संबंधित जिल्हे
११) आयुक्त (वस्त्रोद्योग) वस्त्रोद्योग आयुक्तालय, नागपूर
१२) निवडनस्ती (टेक्स-२).